**कार्यमुल्यांकाधारीत प्रोत्साहन योजना.**

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्रमांक - युआयडी ०४११ / प्र.क्र. ५६ /३९
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई ४०००३२
दिनांक. २९ एप्रिल २०११.

आधार क्रमांकाच्या नोंदणीची प्रक्रीया संपूर्ण राज्यभरात दिनांक १० जानेवारी २०११ पासून सुरु झालेली आहे. यासाठी ग्रामीण भागाकरीता जिल्हाधिकारी, तर महानगर पालिका क्षेत्रासाठी महानगर पालिका आयुक्त यांना निबंधक म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. प्रकल्प यशस्वी होण्यासाठी आणि इच्छीत उद्दीष्ट साध्य करण्यासाठी, निबंधकांकडुन परिणामकारक नियोजन आणि निरंतर प्रयत्न करणे अपेक्षित आहे. प्रकल्प राबविण्याकरिता निबंधकानी केलेल्या प्रयत्नांची दखल घेऊन त्यांना प्रोत्साहनपर पारितोषिके देऊन सन्मानीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. त्यास अनुसरुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

शासन निर्णय-

राज्यातील आधार नोंदणी प्रक्रीया मार्च २०१२ अखेर पर्यंत पुर्ण होणे अपेक्षित आहे म्हणून निबंधकांच्या (जिल्हाधिकारी /महानगर पालिका आयुक्त) कार्याच्या मुल्यमापनासाठी तीन कालावधी सुनिश्चित करण्यात आलेले आहेत. मुल्यमापनासाठी सुनिश्चित केलेला कालावधी व त्या कालावधीत साध्य करावयाचे उद्दीष्ट पुढील प्रमाणे आहेत:-

| मुल्यमापनासाठी सुनिश्चीत केलेला कालावधी | साध्य करावयाचेनोंदणीचे उद्दीष्ट |
|---|---|
| एप्रिल २०११ ते जुन २०११ | जिल्ह्याच्या/महानगर पालिका क्षेत्राच्या एकूण लोकसंख्येच्या २० टक्के. |
| जुलै २०११ ते डिसेंबर २०११ | जिल्ह्याच्या/महानगर पालिका क्षेत्राच्या एकूण लोकसंख्येच्या ५० टक्के. |
| जानेवारी २०१२ ते मार्च २०१२ | जिल्ह्याच्या / महानगर पालिका क्षेत्राच्या एकूण लोकसंख्येच्या ९० टक्के. |

२. निबंधकांच्या (जिल्हाधिकारी /महानगर पालिका आयुक्त) कार्याचे मुल्यमापन वर नमुद केलेल्या कालावधीत, त्यांनी साध्य केलेल्या उद्दिष्टाच्या आधारे करण्यात येईल आणि त्यानुसार त्यांची "अ" आणि "ब" अशी वर्गवारी करुन त्यांना खालीलप्रमाणे प्रोत्साहनपर पारितोषीके देण्यात येतील.

| | | |
|---|---|---|
| "अ" वर्ग | ठरवून दिलेल्या कालावधीत, निर्धारीत केलेल्या उद्दिष्टापेक्षा जास्त नोंदणी केल्यास | रू.५०,००० |
| "ब" वर्ग | ठरवून दिलेल्या कालावधीत निर्धारीत केलेल्या उद्दिष्टाच्या ७० ते १०० टक्के - नोंदणी केल्यास | रू.३५,००० |

३. आधार प्रकल्पाचे लाभ घेण्याकरीता शासनाच्या कार्यपद्धती आणि निर्णय प्रक्रीयेशी सुसंगत असे ॲप्लिकेशन विकसित करणे गरजेचे आहे. असे ॲप्लिकेशन विकसित करणा-या विभागाचे सचिव /समन्वय अधिकारी यांना देखील पारितोषिक देवून सन्मानीत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यासाठी राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात आलेली आहे. समितीचे सदस्य पुढीलप्रमाणे असतील:-

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
उप महासंचालक, भारतीय विशिष्ट ओळख प्राधिकरण (UIDAI), विभागीय कार्यालय,मुंबई.
आय.आय.टी. मुंबई येथील प्राध्यापक.

४.	सदर समिती, आधार प्रकल्पासाठी विविध विभागांनी विकसीत केलेल्या ॲप्लिकेशनचे मुल्यमापन करुन पाच (५) विभागांची निवड करेल, ॲप्लिकेशन यशस्वीरित्या विकसीत करणा-या विभागाचे सचिव /समन्वय अधिकारी यांना रु. एक लाख पारितोषिक देवून सन्मानीत करण्यात येईल.

५.	वरील रोख पारितोषिकां व्यतिरिक्त आधार नोंदणीत "अ"वर्ग प्राप्त करणा-या पहिल्या तीन निबंधकांना (जिल्हाधिकारी /महानगर पालिका आयुक्त) तसेच आधार प्रकल्पासाठी ॲप्लिकेशन विकसित केलेल्या विभागीय सचिवामधील ज्या पाच विभागाच्या सचिव /समन्वय अधिकारी यांना पारितोषिकासाठी निवडण्यात आलेले आहे यांना माहिती तंत्रज्ञानाच्या उपयोगितेसंदर्भात रिओ दि जानेरीआ, दुबई ई. ठिकाणी आयोजित होणा-या आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये सहभागी होण्यासाठी पाठवण्यात येईल. त्याच्या सोबत माहिती तंत्रज्ञान संचालनालयातील २-३ अधिका-यांना पाठवण्यात येईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४२५१२१९१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रत्नाकर गायकवाड)
मुख्य सचिव महाराष्ट्र शासन

प्रति,
सर्व विधान सभा/ विधान परिषद सदस्य
मा. राज्यपाल याचे सचिव
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
उप महासंचालक, विशिष्ट ओळख प्राधिकरण, क्षेत्रीय कार्यालय, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयत) -१/२ महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
महालेखाकार (लेखापरीक्षा) -१/२ महाराष्ट्र , मुंबई / नागपूर
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगर पालीकांचे आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व कोषागारे
निवड नस्ती